**महिलेस तिचा पती किंवा पतीच्या नातेवाईकाकडून क्रूर वागणूक दिल्याप्रकरणी भारतीय दंड संहितेच्या कलम ४९८(अ)चा गैरवापर टाळणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
गृह विभाग
शासन परिपत्रक क्रमांक- डीडीडब्ल्यू ११०९/प्र.क्र. ८३६/विशा-६,
मंत्रालय, मुंबई-४०००३२,
दिनांक **२९** मे २०१०

वाचा :-१) केंद्र शासनाच्या गृह मंत्रालयाचे पत्र क्रमांक - ३/५/२००८ न्यायिक कक्ष दिनांक २०.१०.२००९
२) विधी व न्याय विभागाचे पत्र क्र.एमआयएस/४४५/प्र.क्र.९३०/०९/डी१९ दिनांक २७.१०.२००९

__परिपत्रक -__ एखाद्या महिलेस तिचा पती अथवा पतीच्या नातेवाईकांनी क्रूर वागणूक दिल्यास संबंधितांविरुध्द कडक कारवाई करण्याच्या दृष्टीने भारतीय दंड संहितेमध्ये कलम ४९८-अ चा अंतर्भाव करण्यात आला आहे या कलमानुसार नोंदलेला गुन्हा दखलपात्र व अजामीनपात्र आहे.महिलेस क्रूर वागणूक देण्याच्या घटनेशी प्रत्यक्ष संबंध नसलेल्या नातेवाईकांवर देखील कलम ४९८-अ अन्वये गुन्हा दाखल करण्याच्या घटनांचे प्रमाण वाढत आहे ही बाब विचारात घेऊन भारत सरकारच्या गृह मंत्रालयाने त्यांच्या पत्र क्रमांक - ३/५/२००८ न्यायिक कक्ष दिनांक २०.१०.०९ अन्वये महिलेस तिचा पती अथवा पतीच्या नातेवाईकांनी क्रूर वागणूक देण्याच्या प्रकरणी संबंधितांविरुध्द भारतीय दंड संहितेच्या कलम ४९८-अ अंतर्गत गुन्हयाची नोंद करण्यापूर्वी कोणती दक्षता घेण्यात यावी याबाबत सर्वोच्च न्यायालयाने दिलेले निर्देश आणि इतर आवश्यक तरतूदी निदर्शनास आणून यासंदर्भात ठोस कार्यवाही करण्याची आवश्यकता व्यक्त केली आहे.त्यानुसार राज्यातील सर्व पोलीस स्टेशनला निर्देश देण्याबाबत विधी व न्याय विभागाने दिनांक २७.१०.२००९ च्या पत्रान्वये दिलेले अभिप्राय लक्षात घेता शासन आता असे निर्देश देत आहे की, महिलेस तिचा पती अथवा पतीच्या नातेवाईकांनी क्रूर वागणूक देण्याच्या प्रकरणात पिडीत व्यक्तींकडून तक्रार प्राप्त झाल्यानंतर संबधितांविरुध्द भारतीय दंड संहितेच्या कलम ४९८-अ अंतर्गत गुन्हा दाखल करण्यापूर्वी खालील बाबींची खातरजमा करुन आवश्यक ती कायदेशीर कारवाई करण्यात यावी.

१) वैवाहिक मतभेदासंबंधीच्या तक्रारीबाबत /महिलेस तिचा पती अथवा पतीच्या नातेवाईकांनी क्रूर वागणूक देण्याच्या प्रकरणी तक्रार प्राप्त झाल्यानंतर प्रथमतः दोन्हो पक्षांना समोपचार मार्गदर्शन /समुपदेशन या मार्गाने त्याच्यातील मतभेद मिटविण्याकरिता प्रवृत्त करण्यात यावे व त्याकरिता मदत करण्यात यावी. हे प्रयत्न असफल झाल्यानंतरच प्रकरणपरत्वे भारतीय दंड संहितेच्या कलम ४९८- अ अंतर्गत प्रकरण योग्य ठरत असल्यास सदर कलमांतर्गत अथवा अन्य कायद्यांतर्गत कायदेशीर कारवाई करण्यात यावी.

२) पिडीत व्यक्तीकडून तक्रार अर्ज प्राप्त झाल्यानंतर आरोपीस वॉरंट शिवाय तात्काळ अटक न करता प्राथमिक चौकशी करुन सदर चौकशीमध्ये तक्रारीमध्ये तथ्य आढळल्यास आवश्यकतेनुसार आरोपीस भारतीय दंड संहितेच्या कलम ४९८ अ अथवा अन्य कायद्यांतर्गत अटक करण्यात यावी.

३) प्रत्येक पोलीस ठाण्यात उपलब्ध मनुष्यबळातून महिला कक्ष निर्माण करण्यात यावा आणि अशा तक्रारीवर सदर महिला कक्षामार्फत कारवाई करण्यात यावी. पोलीस आयुक्तालय क्षेत्रासाठी/पोलीस अधीक्षक क्षेत्रासाठी निर्माण करण्यात आलेल्या महिला सहायता कक्षाच्या माध्यमातून या तक्रारींचे निराकरण करण्यासाठी मदत घेण्यात यावी.

४) कौटुंबिक हिंसाचारग्रस्त व पिडीत महिलांच्या समुपदेशनासाठी महिला व बाल विकास विभागामार्फत राज्यात सध्या पोलीस स्टेशनच्या आवारामध्ये २० महिला समुपदेशन केंद्रे सुरु आहेत.त्याधर्तीवरच उर्वरीत जिल्हयातही महिला व बाल विकास विभागाने पोलीस स्टेशनच्या आवारात महिला समुपदेशन केंद्रे सुरु करावीत.या केंद्रासाठी लागणारी जागा व आवश्यक कार्यालयीन सोयी-सुविधा संबंधित पोलीस स्टेशन मार्फत पुरविण्यात याव्यात

२. प्रस्तुतचे परिपत्रक हे महिला व बाल विकास विभागाच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

(सु. ग. सोनवणे )
उप सचिव, गृह विभाग,महाराष्ट्र शासन

प्रति,

१) सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
२) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३) विशेष पोलीस महानिरीक्षक (म.अ.प्र.क.)
४) सर्व पोलीस आयुक्त
५) सर्व पोलीस अधिक्षक
६) आयुक्त,महिला व बाल विकास संचालनालय,पुणे.